सन २०२०-२१ मध्ये कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत गळीतधान्य व तेलताड अभियान उर्वरीत वार्षिक कृती आराखड्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : अेअेपी-२०२०/प्र.क्र.३३ /४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ०८ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा:-**

१) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि.१९/०४/२०१७
२) वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०
३) कृषी सहकार व शेतकरी कल्याण विभाग, भारत सरकार यांचे पत्र क्र. F.No.१-१/२०२०-OS(DC), दि.०८ मे, २०२०
४) शासन पत्र क्र. AAP-२०२०/Cr.No.३८/२-A, दि. १३ मे, २०२०.
५) कृषी सहकार व शेतकरी कल्याण विभाग, भारत सरकार यांचे पत्र क्र.F.No.२-१५/२०२० NFSM(OS), दि. १४ मे, २०२०.
६) आयुक्तालयाचे पत्र क्र. राअसुअ ग.तेल. २०२०-२१/ प्र. मा.प्रस्ताव/ प्र.क्र.१/ वा.कृ.आ./ १२८९९/ २०, दि. १५ मे, २०२०
७) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. अेअेपी-२०२०/प्र.क्र. ३२/४-अे, दि.०६/०६/२०२०
८) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. अेअेपी-२०२०/प्र.क्र. ३२ /४-अे, दि.१६/०६/२०२०
९) आयुक्तालयाचे पत्र क्र. राअसुअ ग.तेल. २०२०-२१/ प्र. मा.प्रस्ताव/ प्र.क्र.१/ सुधा.प्र.मा.प्रस्ताव/ २०२०/२४३५९, दि.५.१०.२०२०

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाच्या संदर्भांकित दि. ०८ मे, २०२० च्या पत्रान्वये सन २०२०-२१ करिता या अभियानातर्गत गळीतधान्य व तेलताड पिकांकरिता राज्य शासनास मंजूर करण्यात आलेल्या नियतव्यय (Allocation) मर्यादेत एकूण रु. ६५३९.१८ लाख रकमेचा वार्षिक कृति आराखडा केंद्र शासनाच्या मंजुरीस्तव सादर केला होता. केंद्र शासनाने संदर्भांकित दि. १४ मे, २०२० च्या पत्रान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व तेलताड) अभियान राज्यात सन २०२०-२१ या वर्षात राबविण्यासाठी रु. ६४०३.०६ लक्ष निधीच्या वार्षिक कृती आराखड्यास मंजुरी प्रदान केलेली आहे. कोविड-१९ च्या पार्श्वभूमीवर वित्त विभागाचे संदर्भांकित दि. ०४ मे, २०२० च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.२ नुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व तेलताड) करीता वार्षिक कृति आराखड्यास क्रमांक ७ व ८ च्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये रु. २११३.०१२ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे तथापि, केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानातंर्गत गळीतधान्य व तेलताड पिकांकरिता करीता सन २०२०-

२१ या वर्षाचा पहील्या हप्त्यासाठी रु. १९०५.००लाख इतका व रु १३७३.०८ लाख इतका पुनर्जिवीत असा एकुण रु. ३२७८.०८ लाख निधी राज्य शासनास उपलब्ध करून देण्यात आलेला आहे. तथापि, कोविड-१९ च्या पार्श्वभूमिवर वित्त विभागाच्या दि.०४ मे. २०२० च्या शासन निर्णयानुसार आर्थिक निर्बंध घातले गेले आहेत, त्यामुळे राज्य हिस्स्याचा निधी समप्रमाणात उपलब्ध नसल्यामुळे केंद्र हिस्स्याचा निधी उपलब्ध असूनही आद्याप पर्यंत सदर प्राप्त निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

सबब, केंद्र हिस्स्याच्या निधी अखर्चित राहील्यास यापुढे केंद्र शासनाकडून निधी मिळण्यास समस्या निर्माण होवू शकते. तसेच सन २०२०-२१ मध्ये रबी हंगाम २०२०-२१ च्या पार्श्वभुमीवर राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाची अमंलबजावणी करणे आवश्यक आहे. त्यासाठी राज्य हिस्स्याच्या निधीची आवश्यकता भासणार आहे. त्यानुषंगाने सन २०२०-२१ करिता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानातंर्गत **केंद्र शासनाकडून पहिल्या हप्त्यापोटी व पुर्नजिवित करून देण्यात निधीच्या समप्रमाणात राज्य हिस्स्याच्या निधी सह यापुर्वी देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यते व्यतीरीत्क** राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान सन २०२०-२१ अतंर्गत गळीतधान्य व तेलताड पिकांकरिता करीता रु. २४८९.७३ लाखाच्या **उर्वरीत कार्यक्रम** प्रशासकीय मान्यत प्रदान करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

<u>शासन निर्णय</u>

१) सन २०२०-२१ करीता कृषी उन्नती योजनेअंतर्गत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (गळीतधान्य व तेलताड) या अभियानाच्या एकूण रु. **२४८९.७३** लाख (अक्षरी रु.चोवीस कोटी एकोनव्वद लाख त्र्याहत्तर हजार फक्त) निधीच्या उर्वरीत वार्षिक कृति आराखड्यास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**(रु लाख)**

| **अ.क्र.** | **तपशील** | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** | **एकूण** |
|---|---|---|---|---|
| १ | रा.अ.सु.अ.गळीतधान्य नियमित कार्यक्रम | **१५०१.८४** | **९८७.८९** | **२४८९.७३** |

२) सदर वार्षिक कृति आराखड्यातील घटक / उपघटकनिहाय मंजूर आर्थिक व भौतिक लक्षांकाचे विवरण सोबतच्या परीशिष्ट-१ मध्ये नमूद केले आहे. सदर अभियानाची केंद्र व राज्याचा ६०:४० आर्थिक सहभागाच्या प्रमाणात (अपवाद प्रलंबित दायित्व) अंमलबजावणी करण्यात यावी.

३) सदर अभियानाच्या अंमलबजावणीकरीता केंद्र व राज्य हिस्याचा निधी ६०:४० प्रमाणात (अपवाद प्रलंबित दायित्व) वेळोवेळी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करून देण्यात येईल. सदर निधी केंद्र व राज्य हिश्याचा पुढील लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ करीता करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीत तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **सर्वसाधारण** | मागणीक्रमांक डी-३<br>२४०१- पीकसंवर्धन<br>(००) (१०२) अन्नधान्यपिके<br>(००) (२५) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीयअन्नसुरक्षाअभियान-अन्नधान्य पिके (केंद्रहिस्सा) (६०% केंद्र)(२४०१ ४६१४) (योजनांतर्गत) (दत्तमत)३३, अर्थसहाय्य | मागणीक्रमांकडी-३<br>२४०१- पीकसंवर्धन<br>(००) (१०२) अन्नधान्यपिके<br>(००) (३३) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीयअन्नसुरक्षाअभियान-अन्नधान्य पिके (राज्यहिस्सा) (४०% केंद्र)<br>(२४०१ A२३४) (योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य |
| **अनुसूचित जाती** | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००)(७८९) अनुसूचीत जाती उपयोजना<br>(००) (०५) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(केंद्र हिस्सा ६०%)अनुसूचित जाती उपयोजना (२४०१ B१०५),<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००)(७८९) अनुसूचीत जाती उपयोजना<br>(००) (०६) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(राज्य हिस्सा ४०%)अनुसूचित जाती उपयोजना (२४०१ B११४),<br>३३, अर्थसहाय्य |
| **अनुसूचित जमाती** | मागणी क्रमांक टी-५<br>२४०१- पीक संवर्धन,<br>७९६-जनजाती क्षेत्रांतर्गत उपयोजना (पंचवार्षिक योजनांतर्गत योजना),<br>जनजाती क्षेत्राअंतर्गत उपयोजना,<br>(०१) (२१) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ A५५७)<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक टी-५<br>२४०१- पीक संवर्धन,<br>७९६-जनजाती क्षेत्रांतर्गत उपयोजना<br>(पंचवार्षिक योजनांतर्गत योजना),<br>जनजाती क्षेत्राअंतर्गत उपयोजना,<br>(०१) (२२) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(राज्य हिस्सा ४०%)<br>(२४०१ A५६६)३३, अर्थसहाय्य |

४) सन २०२०-२१ मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, म.रा.पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे |
| २. | विभाग स्तर | संबधित विभागीय कृषि सह संचालक | संबधित विभागीय कृषी सह संचालक कार्यालयातील लेखाधिकारी |
| ३. | जिल्हा स्तर | संबधित जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | संबधित जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

५ केंद्र शासनाने कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत विहित केल्याप्रमाणे अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच महिला शेतकरी लाभार्थ्यांना सदर योजनेंतर्गत लाभ देण्यात यावा.

६) केंद्रीय कृषी मंत्रालयाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत राज्य शासनास सन २०२०-२१ करिता संदर्भाकिंत दि.१४ मे, २०२० रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार, तसेच चालू वर्षी अभियानाकरिता मंजूर केलेल्या कृती आराखड्यानुसार आणि वेळोवेळी केंद्रीय मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील, याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे सनियंत्रण करावे, त्याप्रमाणे अभियानाची प्रभावी अंमलबजावणी व सनियंत्रणाकरिता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निर्देशित करावे.

७) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाच्या विविध घटकांतर्गत लाभार्थी शेतकरी निवडतेवेळी अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना वा सदर शेतकऱ्यांच्या गटांना प्राधान्य देण्यात यावे. तसेच, शेतकऱ्यांचे अर्ज मागवून पारदर्शक पद्धतीने लाभार्थ्याची निवड करावी.

८) या अभियानातर्गत विविध निविष्ठांच्या खरेदीसाठी (खते, औषधे, बियाणे, सिंचन साधने, यंत्र/औजारे इ.) शासनाच्या प्रचलित धोरणानुसार थेट लाभार्थ्यांच्या बँक खाती अनुदान जमा करण्यात (Direct Benefit Transfer) यावे. सदर निविष्ठांची खुल्या बाजारातून खरेदी करण्याचे स्वातंत्र लाभार्थ्याला राहील. तथापि, या अभियानातर्गत शासकीय संस्थांनी/ शासनाच्या सार्वजनिक उपक्रमांनी उत्पादित केलेल्या निविष्ठाचा पुरवठा करण्यात येत असल्यास संदर्भाकीत शासन निर्णय दि. १९/०४/२०१७ नुसार कार्यवाही करावी.

९) संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिका-यांनी/तालुका कृषि अधिका-यांनी अभियानाकरीता लाभार्थीची निवड करून अभियानांतर्गत समाविष्ट कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका स्तरावर संकलित करावी. सदर यादीमध्ये शेतक-यांचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक या बाबींसह मोबाईल/दूरध्वनी क्रमांक बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. बाबतची माहितीचा अंतर्भाव असावा. त्याचप्रमाणे अभियानांतर्गत निवडण्यात आलेल्या लाभार्थांची यादी निधी प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांमध्ये कृषि विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिका-यांची राहील.

१०) सदर लाभार्थांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतक-यांच्या शेतावर हाती घेण्यात आलेल्या कार्यक्रमाची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषि सहाय्यकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषि अधिका-यांमार्फत जिल्हा अधिक्षक कृषि अधिका-यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषि सहाय्यकांचे अहवाल प्राप्त होताच सदर कार्यक्रमांतर्गत राबविण्यात आलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी मार्गदर्शक सूचनेमध्ये विहित करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००८१५४७४४१५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सहपत्र : वरीलप्रमाणे**

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2020.10.08 15:55:26 +05'30'

**( सुग्रिव धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
११) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१२) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१३) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१४) महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१८) सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१९) वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती.

**प्रपत्र**

**रा.अ.सु.अ.(गळीतधान्य) सन २०२०-२१ अंतर्गत उर्वरित वार्षिक कृति आराखड्यास प्रशासकीय मंजुरी**

| अ. क्र. | घटक / बाब | परिमाण | कोविड-१९ च्या पार्श्वभूमीवर यापूर्वी प्रदान केलेली प्रशासकीय मान्यता (शा.नि.दि. ०६ व दि.१६/०६/२०२०) | | उर्वरित कार्यक्रमास आता प्रदान केलेली प्रशासकीय मान्यता | | एकूण प्रशासकीय मान्यता | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक |
| अ) नियमीत कार्यक्रम सन २०२०-२१ | | | | | | | | |
| १) | *बियाणे घटक | | | | | | | |
| अ | मूलभूत बियाणे खरेदी (@ बियाणे पूर्ण किंमत) | क्विंटल | ० | ०.०० | १७२ | २०.०० | १७२ | २०.०० |
| ब | पायाभूत बियाणे उत्पादन (@रु. २५००/प्र.क्विं) | | ० | ०.०० | ६५०० | १६२.५० | ६५०० | १६२.५० |
| क | प्रमाणित बियाणे उत्पादन (@रु. २५००/प्र.क्विं) | | ० | ०.०० | २२००० | ५५०.०० | २२००० | ५५०.०० |
| ड | प्रमाणित बियाणे वितरण (@रु. २५००/प्र.क्विं) | | ० | ०.०० | ० | ०.०० | ० | ०.०० |
| **एकुण......(१)** | | ---- | ---- | **०.००** | ---- | **७३२.५०** | ---- | **७३२.५०** |
| २) | तंत्रज्ञान प्रसारण घटक | | | | | | | |
| अ | गटप्रात्यक्षिके | हेक्टर | ३३०० | १९८.०० | ० | ०.०० | ३३०० | १९८.०० |
| ब | शेतकरी शेतीशाळा (@१४०००/शेतीशाळा) | संख्या | ० | ०.०० | ० | ०.०० | ० | ०.०० |
| क | शेतकरी प्रशिक्षण (@ रु.२४०००/प्र.प्रशिक्षण) | | ० | ०.०० | ० | ०.०० | ० | ०.०० |
| ड | विस्तार अधिकारी प्रशिक्षण(@ रु.३६०००/प्र.प्रशिक्षण) | | ० | ०.०० | ० | ०.०० | ० | ०.०० |
| **एकुण.....(२)** | | --- | ---- | **१९८.००** | ---- | **०.००** | ---- | **१९८.००** |
| ३) | उत्पादन वाढीसाठी निविष्ठा | | | | | | | |
| अ | जिप्सम/पायराईट्स/डोलोमाईट (@ रु. ७५०/प्र.हे) | हेक्टर | ० | ०.०० | ० | ०.०० | ० | ०.०० |
| ब | जैविक खते (@ रु. ३००/प्र.हे) | हेक्टर | ० | ०.०० | ० | ०.०० | ० | ०.०० |
| क | पिक संरक्षण औषधे (@ रु. ५००/प्र.हे) | हेक्टर | ० | ०.०० | ० | ०.०० | ० | ०.०० |
| ड | एन.पी.व्ही.चा पुरवठा (@ रु. ५००/प्र.हे) | हेक्टर | ० | ०.०० | ० | ०.०० | ० | ०.०० |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **इ** | **सुधारीत कृषि औजारे** | | | | | | | | |
| i) | मनुष्यचलीत (किमतीच्या ५० % रु. १००००/- मर्यादेत ) | संख्या | ० | ०.०० | ० | ०.०० | ० | ०.०० |
| ii) | स्वयंचलित (अनुदान SMAM प्रमाणे) | संख्या | ० | ०.०० | १२६० | ९४५.०० | १२६० | ९४५.०० |
| उ | पाईप्सचा पुरवठा (@ रु. १५०००/प्र. ६००मी.संच) | मीटर | ० | ०.०० | ९५०००० | ४७५.०० | ९५०००० | ४७५.०० |
| **एकुण.....(३)** | | ---- | ---- | **०.००** | ---- | **१४२०.००** | ---- | **१४२०.००** |
| **४)** | **फ्लेक्झीफंड (गरजेनुरुप उपक्रम)** | | | | | | | | |
| अ | शेततळे | संख्या | ० | ० | २०० | १००.०० | २०० | १००.०० |
| ब | गोदाम बांधकाम (२५० मे.टन क्षमता (@ रु.१२.५० लाख) | संख्या | ० | ० | ० | ०.०० | ० | ०.०० |
| क | डीझेल पंपसंच (@ रु.१००००/संच) | संख्या | ० | ० | १५७० | १५७.०० | १५७० | १५७.०० |
| **एकुण..... (४)** | | ---- | ---- | **०.००** | ---- | **२५७.००** | ---- | **२५७.००** |
| **५)** | **अभियान व्यवस्थापन खर्च** | | | | | | | | |
| अ | तांत्रीक सहाय्यता गट मानधन | संख्या | २२ | ५१.३३ | १९ | ६९.८१ | ४१ | १२१.१४ |
| ब | भाडे तत्त्वावर वाहन घेणे | ---- | ० | ०.०० | ० | ०.०० | ० | ०.०० |
| क | संकीर्ण | ---- | ० | ०.०० | --- | १०.४२ | ---- | १०.४२ |
| **एकुण....(५)** | | ---- | --- | **५१.३३** | --- | **८०.२३** | --- | **१३१.५६** |
| **एकुण नियमीत कार्यक्रम.....अ (१ ते ५ )** | | ---- | ---- | **२४९.३३** | ---- | **२४८९.७३** | ---- | **२७३९.०६** |
| **ब) सन २०१९-२० मधील प्रलंबित दायीत्व** | | --- | ---- | ३८६.२१ | ---- | ०.०० | ---- | ३८६.२१ |
| **एकुण एकंदर (अ + ब)** | | --- | ---- | **६३५.५४** | ---- | **२४८९.७३** | --- | **३१२५.२७** |
| **एकुण केंद्र हिस्सा** | | | ---- | **३८१.३२** | ---- | **१५०१.८४** | ---- | **१८८३.१६** |
| **एकुण राज्य हिस्सा** | | | ---- | **२५४.२२** | ---- | **९८७.८९** | ---- | **१२४२.११** |